“राज्य मुख्य सेवा हक्क आयुक्त” यांच्या कार्यालयासाठी नियंत्रक अधिकारी / आहरण व संवितरण अधिकारी घोषित करणे...

# महाराष्ट्र शासन
## सामान्य प्रशासन विभाग
## शासन निर्णय क्रमांकः आरटीएस-२०१७/प्र.क्र.४८/१८ (र.व का.)

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक : १३ एप्रिल, २०१७

**वाचा :**

१) शासन अधिसूचना, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक : आरटीएस-२०१७/प्र.क्र.३५/१८ (र. व का.), दिनांक २८ फेब्रुवारी २०१७.

२) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक : आरटीएस-२०१७ /प्र.क्र. ४८/१८ (र.व का.), दिनांक १६ मार्च २०१७.

**शासन निर्णय :**

“महाराष्ट्र लोकसेवा हक्क अधिनियम, २०१५” च्या प्रभावी अंमलबजावणीकरीता दिनांक १६ मार्च २०१७ च्या शासन निर्णयान्वये “लोकसेवा हक्क आयोग” नवीन योजनांतर्गत योजनेसाठी नवीन लेखाशीर्ष उघडण्यास मान्यता देण्यात आली.

२. तसेच “राज्य मुख्य सेवा हक्क आयुक्त” यांचे कार्यालय नियमितरित्या कार्यान्वित होईपर्यंत, सदर कार्यालयातील अधिकारी व कर्मचाऱ्यांचे वेतन व भत्ते व इतर खर्च यांसाठी “मागणी क्रमांक-ए-४, २०७०, इतर प्रशासनिक सेवा, ८०० इतर खर्च (००)(१०) महाराष्ट्र राज्य सेवा हक्क आयोग, (२०७० ए००२) (योजनांतर्गत)” हा लेखाशीर्ष तात्पुरत्या स्वरुपात सामान्य प्रशासन विभाग (खुद्द) मध्ये रोख शाखा (कार्यासन-२६) कडे कार्यान्वित करण्यास आणि सदर लेखाशीर्षाच्या नियंत्रणासाठी नियंत्रक अधिकारी म्हणून उपसचिव (आस्थापना) आणि आहरण व संवितरण अधिकारी म्हणून अवर सचिव (२६-रोख शाखा) या पदधारकांस घोषित करण्यास मंजुरी देण्यात आली.

३. आता राज्य मुख्य सेवा हक्क आयुक्त यांचे कार्यालय निर्मल इमारत, दुसरा मजला, नरिमन पॉईंट, मुंबई ४०० ०२१ येथे नियमित स्वरुपात सुरु झाले आहे. सदर कार्यालयातील उपसचिव व कक्ष अधिकारी ही पदे विहित पद्धतीने भरण्यात आली आहेत.

४. सामान्य प्रशासन विभाग (खुद्द) मध्ये रोख शाखा (कार्यासन-२६) कडे तात्पुरत्या स्वरुपात कार्यान्वित असलेला “मागणी क्रमांक-ए-४, २०७०, इतर प्रशासनिक सेवा, ८०० इतर खर्च (००)(१०) महाराष्ट्र राज्य सेवा हक्क आयोग, (२०७० ए००२) (योजनांतर्गत)” हा लेखाशीर्ष राज्य मुख्य सेवा हक्क आयुक्त, मुंबई या कार्यालयाकडे हस्तांतरित करण्यात येत आहे. तसेच उक्त लेखाशीर्षाच्या नियंत्रणासाठी संदर्भाधीन क्रमांक-२,

दिनांक १६ मार्च २०१७ च्या शासन निर्णयान्वये तात्पुरत्या स्वरुपात नियुक्त केलेल्या नियंत्रक अधिकारी आणि आहरण व संवितरण अधिकारी यांच्याऐवजी या आदेशाच्या दिनांकापासून सदरहू कार्यालयातील उपसचिव यांना नियंत्रक अधिकारी तर कक्ष अधिकारी (रोख शाखा) या पदधारकास आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०४१३१६३११४९७०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Santosh Vithal Rokade

Digitally signed by Santosh Vithal Rokade
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=GAD, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=ca5751ffedbb005fdff34ab6ac1f8319d061483d7d35e20f744e251360f7920a, cn=Santosh Vithal Rokade
Date: 2017.04.13 16:32:57 +05'30'

**( संतोष वि.रोकडे )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

**प्रत,**

१. राज्य मुख्य सेवा हक्क आयुक्त,
२. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई.
३. महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई.
४. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-२, नागपूर.
५. महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र-२, नागपूर.
६. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
७. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
८. राज्य सूचना अधिकारी, राष्ट्रीय सूचना केंद्र, नवीन प्रशासकीय भवन, मंत्रालय, मुंबई.
९. सहसचिव (अर्थसंकल्प), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०. उपसचिव (व्यय-४), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
११. उपसचिव तथा नियंत्रक अधिकारी (कार्यासन-२६), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२. अवर सचिव तथा आहरण व संवितरण अधिकारी (कार्यासन-२६), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय,
१३. उपसचिव (कार्यासन-२५ अर्थसंकल्प कक्ष), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई
१४. निवड नस्ती / १८ (र.व का.).